दिनांक ७ नोव्हेंबर हा दिवस विद्यार्थी दिवस म्हणून साजरा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:- बैठक-२०१८/प्र.क्र.२०७/समन्वय**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक:- ०३ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा</u>:- १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- औचिमू-२५१६/ प्र.क्र.१४७/ १७/ एस.डी.४, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- बैठक-२०१७/ प्र.क्र.१७३/ समन्वय, दिनांक ३ नोव्हेंबर, २०१७.

<u>प्रस्तावना:-</u>

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिनांक ७ नोव्हेंबर, १९०० रोजी प्रतापसिंग हायस्कुल, राजवाडा चौक, सातारा या शाळेमध्ये प्रवेश केला. शिक्षण हेच उन्नतीचे एकमेव साधन असून आदर्श विद्यार्थी निर्माण करण्यासाठी आवश्यक असलेल्या कठोर परिश्रमांची जाण सर्व विद्यार्थ्यांना होण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा शाळा प्रवेश दिन, दिनांक ७ नोव्हेंबर हा दिवस दरवर्षी “विद्यार्थी दिवस” म्हणून साजरा करण्यासंदर्भात शालेय शिक्षण विभागाने वाचा क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच सन २०१७ मध्ये दिनांक ७ नोव्हेंबर हा दिवस राज्यात विद्यार्थी दिवस म्हणून मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यासाठी वाचा क्र. २ येथील शासन परिपत्रकान्वये विविध सूचना/निर्देश देण्यात आले होते. सन २०१८ मध्ये देखील दिनांक ७ नोव्हेंबर हा दिवस गतवर्षीप्रमाणे “विद्यार्थी दिवस” म्हणून साजरा करण्यासाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहु बैठकीमध्ये मा. मंत्री, सामाजिक न्याय यांनी सन २०१८ मध्ये विद्यार्थी दिवस साजरा करण्यासंदर्भात सूचना दिलेल्या आहेत.

**शासन परिपत्रक**:-

गतवर्षीप्रमाणे सन २०१८ या वर्षीदेखील दिनांक ७ नोव्हेंबर हा दिवस राज्यात विद्यार्थी दिवस म्हणून साजरा करण्यासाठी पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

अ. यावर्षी, सन २०१८ मध्ये दि. ७ नोव्हेंबर रोजी दिवाळीनिमित्त राज्यातील सर्व शाळांना सुट्ट्या आहेत. त्यामुळे मोठा कार्यक्रम घेण्याऐवजी राज्यातील सर्व दलित वस्त्यांमध्ये व शहरातील झोपडपट्ट्यांमध्ये विद्यार्थ्यांना पुस्तकांचे वाटप करणे व त्यांना शिक्षणाची आवड निर्माण करणे अथवा त्याच्यासोबत दिवाळी साजरी करणे, असे कार्यक्रम राज्यभर आयोजित करण्यात यावे.

आ. तसेच प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी सहायक आयुक्त, समाज कल्याण यांचेमार्फत सामाजिक न्याय भवनामध्ये शालेय विद्यार्थ्यांसाठी वक्तृत्व, चित्रकला, निबंध, रांगोळी यांसारख्या स्पर्धा आयोजित करण्यात याव्यात.

२. उपरोक्त निर्देशांची अंमलबजावणी करण्याबाबत आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे व आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सर्व संबंधितांना तसे निर्देश द्यावेत. तसेच, सदर बाबींवर होणारा खर्च त्यांना उपलब्ध असलेल्या तरतूदीतुन करण्यात यावा, यासाठी स्वतंत्र निधीची तरतूद उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन, त्याचा सांकेतांक २०१८११०३१२१३५४१७२२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by S.G. Patil
Date: 2018.11.03 12:16:47 +05'30'

**( सं. गि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व विभागीय आयुक्त
८. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
९. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
१०.आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
११.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
१२.सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
१३.निवडनस्ती (समन्वय).